कोकण ग्रामीण पर्यटन विकास कार्यक्रम -
सिंधुदुर्ग जिल्हयाच्या प्रकल्प प्रस्तावातील कामांना
सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याबाबत .

# महाराष्ट्र शासन

## ग्राम विकास व जलसंधारण विभाग,

## शासन निर्णय क्रमांक: कोवियो-२०१६/प्र.क्र.४७/योजना-९

बांधकाम भवन, ७ वा मजला, २५, मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई - ४०० ००१.
तारीख : ३० डिसेंबर, २०१६.

वाचा :-

१) शासन निर्णय क्रमांक : ग्राम विकास विभाग, क्र.कोवियो-२०१५/प्र.क्र.७५/योजना-९, दि.२३.११.२०१५
२) शासन निर्णय क्रमांक : ग्राम विकास विभाग, क्र.कोवियो-२०१६/प्र.क्र.४७/योजना-९, दि.१८.०२.२०१६

प्रस्तावना :-

कोकण ग्रामीण पर्यटन विकास कार्यक्रमांतर्गत संदर्भीय दि.२३.११.२०१५ च्या शासन निर्णयास अनुसरुन जिल्हाधिकारी, सिंधुदुर्ग यांनी राज्य स्तरीय समिती, कोकण ग्रामीण पर्यटन विकास कार्यक्रम यांच्या मान्यतेसाठी सादर केलेल्या प्रस्तावाला, संदर्भ क्र.२ येथील दि.१८.०२.२०१६ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. आता, मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सिंधुदुर्ग यांनी त्यांच्या क्र.सिंजिप/ग्रा.पं./ कार्या-४/पर्य./२१२८/१६, दि.१७.०९.२०१६ च्या पत्रान्वये, कोकण ग्रामीण पर्यटन विकास कार्यक्रमातंर्गत सिंधुदुर्ग जिल्हयातील प्रशासकीय मान्यता मिळालेल्या काही कामांच्या अंदाजपत्रकात बदल झाल्यामुळे सदर कामांसाठी सुधारीत प्रशासकीय मान्यतेसाठी सादर केलेल्या प्रस्तावाला मंजुरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

कोकण ग्रामीण पर्यटन विकास कार्यक्रमातंर्गत संदर्भीय दि. २३.११.२०१५ च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार, संदर्भीय दि.१८.०२.२०१६ च्या शासन निर्णयान्वये सिंधुदुर्ग जिल्हयातील प्रशासकीय मान्यता देण्यात आलेल्या कामांच्या अंदाजपत्रकांत बदल झाल्यामुळे मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सिंधुदुर्ग यांनी त्यांच्या दि.१७.०९.२०१६ च्या पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावातील सोबतच्या यादीत नमूद केलेल्या कामांना शासनाची सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. ही मंजुरी वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/विनियम, दि.१५.०५.२००९ अन्वये प्रसिध्द केलेल्या वित्तिय अधिकार नियम पुस्तिका भाग- पहिला, उप-विभाग-तीन मधील अनुक्रमांक ४ येथील परिच्छेद क्र. २७ (२) नुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारास अनुसरुन देण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आलेला असून त्याचा संकेतांक २०१६१२३०१२४७४२३८२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prakash Nathlya Valvi

Digitally signed by Prakash Nathlya Valvi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=RDD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=37e23389b57a9e7ec7b19b76a580789713f16034880d23f1579f9f010c94459d, cn=Prakash Nathlya Valvi
Date: 2016.12.30 16:36:25 +05'30'

**( प्रकाश वळवी )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. प्रधान सचिव, पर्यटन विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण भवन, नवी मुंबई.
३. मुख्य वास्तुविशारद, सा.बां.वि., बांधकाम भवन, मुंबई.
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई.
५. महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई.
६. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पर्यटन विकास महामंडळ, मुंबई.
७. जिल्हाधिकारी, सिंधुदुर्ग.
८. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सिंधुदुर्ग.
९. अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सिंधुदुर्ग.
१०.उप सचिव, पर्यटन, मंत्रालय, मुंबई.
११.मा.मंत्री, ग्राम विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१२.मा. राज्यमंत्री, ग्राम विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१३.अधीक्षक अभियंता (संकल्प चित्र), सार्वजनिक बांधकाम विभाग.
१४.कार्यकारी अभियंता, जि.प.बांधकाम, सिंधुदुर्ग.
१५.जिल्हा कोषागार अधिकारी, सिंधुदुर्ग.
१६.निवड नस्ती, कार्यासन योजना-९, ग्राम विकास व जलसंधारण विभाग.

(ग्राम विकास व जलसंधारण विभाग, शासन निर्णय क्र.कोवियो-२०१६/प्र.क्र.४७/योजना-९,
दिनांक : ३० डिसेंबर, २०१६ चे सहपत्र)

कोकण ग्रामीण पर्यटन विकास कार्यक्रमांतर्गत
सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात आलेल्या सिंधुदुर्ग जिल्हयातील कामांची यादी.

| **अ.क्र.** | **गावाचे नाव** | **कामाचे नाव** | **दि.१८.०२.२०१६ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली रक्कम (लाखात)** | **सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली रक्कम (लाखात)** |
|---|---|---|---|---|
| १. | हडी | १. पोहोच रस्ता | रु.१०.०० | रु.१४.०० |
| | | २. जुवा बेट अंतर्गत रस्ते | रु.१०.०० | रु.०६.०० |
| २. | भोगवे | १. किल्ले निवती मुख्य रस्ता ते किल्ल्यापर्यंत जोड रस्ता | रु.०३.०० | रु.१५.०० |
| | | २. भोगवे कोणकर्वत ते निवती किल्ला जोड रस्ता | रु.१२.०० | काम रद्द |
| ३. | परुळे | पाणीपुरवठा (पर्यटकांसाठी पिण्याचे पाणी) | रु.०२.०० | रु.०३.०० |
| ४. | चिपी | पाणीपुरवठा (पर्यटकांसाठी पिण्याचे पाणी) | रु.०६.०० | रु.०३.०० |
| | | **एकूण** | रु.**४३.००** | रु.**४१.००** |